सन २०१६-१७ मधील मंजूर अर्थसंकल्पीत
तरतूदीचे वितरण करणेबाबत --
अल्पमुदतीच्या कर्जाचे मध्यम मुदतीच्या
कर्जात रुपांतर करण्यासाठी अर्थसहाय्य
(६४२५ ००३७).

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - जिमस १०१६/प्र क्र२८९/२-स**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २७ ऑक्टोबर, २०१६.**

**वाचा :-** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, दि. २०.१०.२०१५, दि. २३.३.२०१६, दिनांक १०.०३.२०१६, दि. २२.४.२०१६ व दि. २७.४.२०१६
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, दिनांक ११.०३.२०१६
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२०.४.२०१६
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दि.१०.५.२०१६

**प्रस्तावना :**

राज्यात टंचाई परिस्थिती जाहीर झालेल्या भागात शेतकऱ्यांना मदत करण्यासाठी अल्पमुदत पीक कर्जाचे रूपांतरण मध्यम मुदत कर्जात केले जाते. जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी पीक कर्जाचे रुपांतरण केल्यानंतर अशा रुपांतरीत कर्जाच्या ६०% रक्कम नाबार्डमार्फत शासनाच्या हमीवर महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस फेरकर्ज म्हणून मंजूर करण्याचे धोरण आहे. याशिवाय रुपांतरीत कर्जाचा १५% हिस्सा राज्य शासनामार्फत व १०% हिस्सा महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेमार्फत कर्ज स्वरुपात उपलब्ध करणे अपेक्षित आहे. उर्वरीत १५% रक्कम संबंधित जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेने स्वभांडवलातून उपलब्ध करणे आवश्यक आहे.

सन २०१५-१६ मधील अल्प मुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जामध्ये रुपांतरण करणेसाठी शासनाच्या हिश्याची १५% रक्कम सुमारे रुपये १२४ कोटी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस उपलब्ध करुन द्यावयाची आहे. तसेच यवतमाळ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेस यापूर्वी अदा न केलेले रुपये ९४९.३७ लाख देय होत आहेत. या प्रयोजनार्थ महाराष्ट्र राज्य सहकारी बँकांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यात टंचाई परिस्थिती जाहीर झालेल्या भागांपैकी खालीलप्रमाणे जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण करण्यासाठी नाबार्डच्या धोरणानुसार राज्य शासनाच्या १५% हिश्श्यापोटी रुपये २४०० लाख (रुपये चोवीस कोटी फक्त) वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर रक्कम रु २४०० लाख महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस मध्यम मुदत कर्ज म्हणून खालील ४ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना पुढे हस्तांतरीत करण्यासाठी अदा करण्यास मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा मध्यवर्ती बँकेचे नाव | राज्य शासनाचा १५% हिस्सा रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|
| १ | यवतमाळ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. (थकबाकी) | ९४९.३७ |
| २ | यवतमाळ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | ९४६.५९ |
| ३ | औरंगाबाद जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | २६.०८ |
| ४ | परभणी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | १६३.७३ |
| ५ | अमरावती जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | ३१४.२३ |
| | **एकूण** | **२४००.००** |

२. वरील कर्जासाठी अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील :-

अ) कर्जाच्या परतफेडीचा कालावधी ५ वर्षाचा राहील.

आ) कर्ज परतफेड व्याजासह समान हप्त्याने करण्यात यावी.

इ) सदर कर्जाचा व्याजदर या योजनेसाठी नाबार्डकडून महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस देण्यात येणा-या फेरकर्जाच्या व्याजदराप्रमाणे राहील.

३) वित्त विभाग परिपत्रक क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र. ८९/ अर्थसं ३, दिनांक २०.४.२०१६ अन्वये "३३ अर्थसहाय्य" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी परिच्छेद ९ वगळता इतर सर्व परिच्छेद या योजनेस लागु नाहीत. तसेच या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४) वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा ५, दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद "ब" मधील २ नुसार वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र.८९/ अर्थसं ३ दिनांक २०.४.२०१६ च्या परिशिष्टातील अनु. क्रमांक १, २, ५, ६, ७ व ८ संदर्भात सदर योजना ही नियमित राज्य योजनांतर्गत योजना असल्याने व "५५- कर्जे व आगाऊ रकमा" याखाली कर्ज स्वरुपात वितरीत होणार असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र ३ व ४ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

६) वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा ५, दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

**(१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, परिपत्रक क्र संकिर्ण २०१६/प्र क्र ८९ / अर्थसं ३, दिनांक २०.४.२०१६ अन्वये "५५- कर्जे व आगाऊ रकमा" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त

झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

(२) **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी रु. ३००० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत असून त्यापैकी यापूर्वी निधी वितरीत झाला नाही.

(३) **यास्तव** मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला नाही.

(४) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

(६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- याबाबत क्षेत्रीय कार्यालयांना सहकार आयुक्त स्तरावरुन सूचना देण्यात येत आहेत.

(७) बांधकाम विषयक प्रस्तांवाना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

(८) खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

(७) उपरोक्त कर्ज मंजूरी करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक ३०/१२/२०१४ च्या शासन निर्णयानुसार शासनाने दिलेल्या कर्जाचे लेखे अद्ययावत ठेवण्यासाठी “महाऋण” या आज्ञावलीमध्ये कर्जाची संपूर्ण माहिती भरणे बंधनकारक आहे. यास्तव सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संपूर्ण माहिती वित्त विभागास उपलब्ध करुन देण्याची दक्षता घ्यावी. तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने या संदर्भात आवश्यक ती माहिती संबंधितास उपलब्ध करुन देण्याची दक्षता घ्यावी.

(८) वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या रुपये २४०० लाख रकमेचे वितरण करण्यासाठी लेखा अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा विनियोग विहीत केलेल्या अटी व शर्तीनुसार करण्यात यावा. तसेच योजनेवर झालेला विकास मंडळनिहाय खर्च व लाभार्थ्यांची संख्या यांची माहिती नियोजन विभागाच्या योजना माहिती प्रणाली (MPSIMS) वर दर महिन्याच्या अखेरीस न चुकता भरण्यात यावी.

**(९)** वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेले कर्ज सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,,मागणी क्रमांक व्ही ५, ६४२५-सहकारासाठी कर्जे, (००)(१०७) सहकारी पतसंस्थांना कर्जे, (००) (०३) अल्पमुदतीच्या कर्जाचे मध्यम मुदतीच्या कर्जात रूपांतर करण्यासाठी सहकारी पतसंस्थांना कर्जे (६४२५ ००३७), ५५- कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा.

**(१०)** सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/ प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२०.४.२०१६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

**(११)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१६१०२७१७०८०३३००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2016.10.27 17:12:57 +05'30'

**( दि.म.राणे )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**सोबत : सहपत्र.**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. अपर मुख्य सचिव (मदतकार्य व पूनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई (३ प्रती)
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण) महाराष्ट्र राज्य- नागपूर (३ प्रती)
५. महाव्यवस्थापक, नाबार्ड बँक, प्लॉट नं. सी-२४/जी, बांद्रा-कुर्ला संकुल, पोस्ट बँग नं. ८१२१, बांद्रा पूर्व, मुंबई ४०००५१
६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या, मुंबई.
७. कार्यकारी संचालक, यवतमाळ /औरंगाबाद / परभणी / हिंगोली / अमरावती जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई /पुणे (३ प्रती)
९. निवासी लेखापरिक्षाधिकारी, मुंबई. / पुणे
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११. नियोजन विभाग (१४३१) मंत्रालय, मुंबई
१२. वित्त विभाग (व्यय-२, व्यय-१४, अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई
१३. कक्ष अधिकारी (१६-स, व १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई-३२
१४. निवड नस्ती (२-स)

शासन निर्णय क्र. जिमस १०१६/प्र क्र२८९/२-स, दिनांक २७.१०.२०१६ चे सहपत्र

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १ | संस्थेचे नांव | महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि<br>सर विठठलदास ठाकरसी मेमोरियल<br>बिल्डींग, ९ महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स लेन,<br>फोर्ट मुंबई ४०० ००१ |
| २ | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | सदर योजना नियमित राज्य योजनांतर्गत योजना आहे व "५५ कर्जे व आगाऊ रकमा" याखाली कर्ज वितरणास प्रशासकीय विभागास अधिकार आहेत. |
| ३ | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु ३०,००,००,०००/- |
| ४ | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०१५-१६<br>रु ११६,४५,००,०००/- |
| ५ | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | रु २४,००,००,०००/- |
| ६ | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी. | लागू नाही |
| ७ | एकूण कर्ज परत फेडीचे हप्ते | ५ वार्षिक समान हप्ते |
| ८ | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | रु ४,८०,००,०००/-<br>परतफेड ५ समान हप्त्यात वसूली. |
| ९ | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक / सहामाही/त्रेमासिक इत्यादी | ५ समान वार्षिक हप्त्यात |
| १० | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | ५ वर्षे |
| ११ | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक. | डिसेंबर २०१७ ते डिंसेबर २०२१ |
| १२ | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | डिसेंबर २०१७ |
| १३ | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | डिंसेबर २०२१ |
| १४ | व्याजदर | ८.२० % वार्षिक ( NABARD ने वेळोवेळी ठरविल्यानुसार ) |
| १५ | विलंब कालावधीसाठी दंडनिय व्याज दर व इतर आकार | दंडनिय व्याज दर नाही. |
| १६ | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालवधी जसे वार्षिक / त्रैमासिक/सहामाही इत्यादी | वार्षिक |
| १७ | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | व्ही-५<br>६४२५ सहकारासाठी कर्जे (००)(१०७) सहकारी पतसंस्थांना कर्जे (००)(०३) अल्पमुदतीच्या कर्जाचे मध्यम मुदतीच्या कर्जात रुपांतर करण्यासाठी सहकारी पतसंस्थांना कर्जे (६४२५००३७) |
| १८ | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | मुख्यशिर्ष ६४२५- सहकारासाठी कर्जे (००)(१०७) सहकारी पतसंस्थांना कर्जे (००)(०३) अल्पमुदतीच्या कर्जाचे मध्यम मुदतीच्या कर्जात रुपांतर करण्यासाठी सहकारी पतसंस्थांना कर्जे (६४२५५३८९) |

| | | |
|---|---|---|
| १९ | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | |
| २० | कर्जाशी, संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | व्यवस्थापकीय संचालक,<br>महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि<br>सर विठठलदास ठाकरसी मेमोरियल<br>बिल्डींग, ९ महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स लेन,<br>फोर्ट मुंबई ४०० ००१,<br>दूरध्वरी क्रमांक ०२२-२२८००५०० |
| २१ | शासकीय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | श्री डी. एस. साळुंखे<br>उपनिबंधक, सहकार आयुक्त व निबंधक, कार्यालय, पुणे<br>मोबाईल-९८५०८९३५१४ |
| २२ | डि डि ओ चा नंबर | २२०१००१७२० |